**सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत कार्यरत असणाऱ्या वैद्यकीय अधिकाऱ्यांना ६ व्या वेतन आयोगातील व्यवसायरोध भत्ता मंजुर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्र. मवैअ-१००९/२३३/प्र.क्र.४५५/०९/ सेवा ३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १ एप्रिल, २०१०

वाचा :-
१) सा.आ.वि.शा.नि.क्रमांक एनपीए-१०९८/प्र.क्र.२०२/सेवा-१, दि. ६.६.२०००
२) सा.आ.वि.शा.नि.क्रमांक बीयुडी-१५००/७४६/प्र.क्र.२३०/अर्थसंकल्प, दि. १८.८.२०००
३) सा.आ.वि.शा.नि.क्रमांक एनपीए-१०९८/प्र.क्र.२०२/सेवा-१, दि. २४.८.२०००
४) सा.आ.वि.शा.नि.क्रमांक मवैअ-१००८/२००/प्र.क्र.११६/सेवा-३, दि. २८.७.२००९

परिपत्रक :-

६ व्या वेतन आयोगानुसार सार्वजनिक आरोग्य विभागात कार्यरत असलेल्या संचालक, आरोग्य सेवा, यांच्यासहीत सर्व पात्र वैद्यकीय अधिकाऱ्यांना ६ व्या वेतन आयोगातील मूळ वेतन अधिक ग्रेड वेतन यांच्या २५ टक्के प्रमाणे व्यवसायरोध भत्ता मंजूर करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. परंतु त्यांना मिळणारे एकूण वेतन अधिक व्यवसायरोध भत्ता यांची एकत्रित रक्कम दरमहा रुपये ८५,००० पेक्षा जास्त नसावी.

२. सदर व्यवसायरोध भत्ता शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून लागू होईल.

३. सुधारित दराने देय ठरणारा व्यवसायरोध भत्ता हा अशाच वैद्यकीय पदांना अनुज्ञेय करण्यात यावा की, ज्यावरील नेमणूकीसाठी इंडियन मेडिकल कौन्सिल ॲक्ट १९५६ किंवा डेन्टिस्ट ॲक्ट,१९४८ मध्ये विहित केलेली आवश्यक शैक्षणिक अर्हतेची आवश्यकता आहे आणि ज्या पदांना व्यवसायरोध भत्ता सध्या अनुज्ञेय ठरविण्यात आला आहे, तसेच या विभागाचे नियंत्रणाखाली असलेले आयुर्वेद पदवीधारक अधिकारी, ज्यांना व्यवसायरोध भत्ता अनुज्ञेय आहे असे वैद्यकीय अधिकारीसुध्दा या भत्यासाठी पात्र असतील.

४. व्यवसायरोधभत्ता अनुज्ञेय असणाऱ्या वैद्यकीय अधिकाऱ्यांना कोणत्याही प्रकारे खाजगी, स्वतंत्र व्यवसाय करता येणार नाही व तसे आढळल्यास ते कारवाईस पात्र ठरतील.

५. व्यवसायरोध भत्त्याच्या अनुषंगाने असे सूचित करण्यात येते की, सदरचा व्यवसायरोध भत्ता हा निवृत्ती वेतनासाठी आणि शासकीय निवासस्थानासाठी आकारण्यात येणाऱ्या सेवा शुल्कासाठी हिशोबाबत धरण्यात यावा. या व्यतिरिक्त प्रवास भत्ता, दैनिक भत्ता, घरभाडे भत्ता, शहर भत्ता वेतन निश्चिती इत्यादींसाठी तो हिशोबात धरण्यात येऊ नये.

६. व्यवसायरोध भत्याच्या पोटी येणारा खर्च, संबंधित वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या वेतन व भत्यापोटी येणारा खर्च ज्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येतो त्या लेखाशीर्षाखाली खर्ची दाखविण्यात यावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने, त्यांच्याकडील अनौपचारीक संदर्भ क्र.अनौसं-४६१/सेवा-५, दि.३०.१.२०१० व क्र.अनौसं.-४३/२०१०/सेवा-४, दि. १८.२.२०१० नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला, असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१००४०५११६५०१३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( सूर्यकांत निकम )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
अभियान, संचालक, राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान, मुंबई.
प्रकल्प संचालक, महाराष्ट्र राज्य एडस नियंत्रण सोसायटी, मुंबई.
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
उपसंचालक, आरोग्य सेवा (सर्व मंडळे) (टी.बी.बी.सी.जी. सहीत)
जिल्हा शल्य चिकित्सक (सर्व)
जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व)
अधिक्षक, वैद्यकीय महाविद्यालये व रुग्णालये.
अधिक्षक, प्रादेशिक मनोरुग्णालये/अधिक्षक,उरो रुग्णालय/क्षय रुग्णालये/पोलीस सर्जन, मुंबई.
प्राचार्य, सार्वजनिक आरोग्य संस्था, नागपूर.
प्राचार्य, आरोग्य व कुटुंब कल्याण प्रशिक्षण केंद्रे (सर्व)
महालेखापाल, महाराष्ट्र १/२,(लेख परीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य, मुंबई /नागपूर.
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
वैद्यकीय अधिक्षक, कुटीर रुग्णालये/वैद्यकीय अधिकारी, प्राथमिक आरोग्य केंद्र (सर्व)
मंत्रालयीन विभाग (सर्व)
मा. मंत्री (सा.आ. व कु.क.) यांचे खाजगी सचिव /रा.मं. (सा.आ.व कु.क.) यांचे खाजगी सचिव.
अ.मु.स. (आरोग्य व कु.क.) यांचे स्वीय सहाय्यक, सा.आ.वि.
आयुक्त कुटंब कल्याण यांचे स्वीय सहाय्यक.
वित्त विभाग (सेवा-१०), व्यय-१३, मंत्रालय, मुंबई.
सर्व उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती - सेवा-३.